**बकरी ईदच्या दिवशी राज्यात जनावरांची अवैध हत्या/हालचाल झाल्यास त्याविरुद्ध पोलीसांनी करावयाची कारवाई**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग (विशेष)
परिपत्रक क्र.डिआयएस०११०/२००/प्र.क्र.४३/विशा-१ब
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : १२ नोव्हेंबर, २०१०

परिपत्रक

राज्यात या वर्षी १७.११.२०१० रोजी बकरी ईद साजरी केली जाणार आहे. बकरी ईदच्या दिवशी राज्यात जनावरांच्या होणाऱ्या अवैध हत्या/हालचाली संदर्भात पुढील सूचना विचारात घ्याव्यात:-

अ) महाराष्ट्र प्राणी संरक्षण कायदा, १९७६ मधील कलम-५ नुसार राज्यात गोहत्येस पूर्णत: बंदी आहे. त्यामुळे गाईची कत्तल करण्यात येऊ नये.

ब) एक वर्षे व त्याखालील कोणत्याही वासरांची कत्तल करण्यात येऊ नये.

क) एक वर्षावरील कोणत्याही गोवंशीय नराची कत्तल उपरोक्त कायद्याच्या कलम ६ नुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पात्रतेच्या प्रमाणपत्राशिवाय करण्यात येऊ नये.

याबाबी विचारात घेऊन राज्यात जनावरांची अवैध हत्त्या होणार नाही याबाबत सर्व पोलीस यंत्रणेने व जिल्हाधिकारी यांनी खात्री करावी व योग्य ती काळजी घ्यावी.

२. बकरी ईदच्यावेळी पशुवधगृहांमध्ये बेकायदेशीररित्या जनावरांची कत्तल होऊ नये यासाठी त्या ठिकाणी पुरेसा पोलीस बंदोबस्त ठेवण्यात यावा. तसेच उपरोक्त कायद्याच्या कलम ७ नुसार पशुवधगृहाशिवाय अन्यत्र खाजगी स्थळावर, घरोघरी, गल्ली-मोहल्ला इत्यादी ठिकाणी जनावरांची कत्तल होऊ नये यासंबंधाने आवश्यक ती खबरदारी पोलीसांनी घ्यावी.

३. बकरी ईदच्यावेळी जनावरांची अवैधरित्या होणारी कत्तल टाळण्याच्या दृष्टीने सर्व जिल्ह्यांच्या ठिकाणी संबंधित पोलीस अधीक्षकांनी संबंधित परिवहन अधिकारी, पशुसंवर्धन अधिकारी, नगरपालिकेचे मुख्य प्रशासकीय अधिकारी यांची बैठक घ्यावी. या बैठकीमध्ये अवैधरित्या होणारी जनावरांची कत्तल टाळण्याच्या दृष्टीने घ्यावयाच्या दक्षतेबाबत मागदर्शन करण्यात यावे.

४. बकरी ईदच्यावेळी महाराष्ट्र प्राणी कल्याण कायदा संनियंत्रण समितीने नेमलेले मानद प्राणी कल्याण अधिकारी यांनी जनावरांची अवैध कत्तल करण्याचे प्रयत्न किंवा त्या प्रयोजनाने वाहतूक होत असल्या संबंधात तक्रारी पाठविल्यास त्याची तात्काळ दखल घेऊन पोलीसांनी कारवाई करावी तसेच तक्रारदारांनी मदत मागितल्यास ती सत्वर देण्यात यावी.

५. बकरी ईदच्यावेळी गोवंशहत्या प्रतिबंध कायदा असणाऱ्या पर राज्यातून मोठ्या प्रमाणात जनावरांची या राज्यात वाहतूक केली जाते. त्या अगोदर जनावरांना जाणीवपूर्वक

अपंग करण्याचे प्रकार सुध्दा घडतात. यासाठी वाहतूक करणाऱ्या वाहनांमधील जनावरांची तज्ज्ञांकडून तपासणी करण्यात यावी. त्यावेळी जनावराना मुद्दाम अपंग केल्याचे वा जनावरांची वाहतूक अवैध कत्तलीसाठी होत आहे असे लक्षात आल्यास संबंधितांवर कायद्यानुसार तात्काळ कारवाई करण्यात यावी. अटकाव केलेली जनावरे संबंधित इसमाच्या ताब्यात लागलीच न देता पुढील किमान ८ दिवस जवळच्या स्वयंसेवी संस्थांनी चालविलेल्या गोशाळा/पांजरपोळ किंवा पशुसंवर्धन गृहात ठेवण्याची व त्यांच्या चारा-पाण्याची व्यवस्था करण्यात यावी. सीमावर्ती चेक नाक्याच्या ठिकाणी पोलीसांनी याबाबत विशेष दक्षता घ्यावी. तसेच मुंबईमध्ये प्रवेश करण्यासाठीचे जे तपासणी नाके आहेत त्या ठिकाणी वरील बाबींच्या दृष्टीने विशेष खबरदारी घेण्यात यावी.

६. उपरोक्त प्रसंगी राज्यातील शांतता तसेच कायदा व सुव्यवस्था अबाधित राहील. तसेच कोठेही जातीय तणाव निर्माण होणार नाही याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्यात यावी.

७. वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार नावांने,

प्र. दीक्षित

(प्रवीण दीक्षित)
प्रधान सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

प्रधान सचिव, पुशसंवर्धन, दुग्ध व्यवसाय व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव (परिवहन व राज्य उत्पादन शुल्क) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त (पोलीस आयुक्त बृहन्मुंबई वगळून)
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व पोलीस अधीक्षक
निमंत्रक,महाराष्ट्र प्राणी कल्याण कायदा संनियंत्रण समिती, १९ वा मजला,नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-३२
संग्रहार्थ नस्ती/ निवडनस्ती